सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१५/प्र.क्र.१०४/पापु-१४

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: २ सप्टेंबर, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९
३) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.२१२/पापु-१४, दिनांक ८ मे, २०१२
४) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.४१८/पापु-१४, दिनांक ४.०१.२०१४
५) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.४८/पापु-१४, दिनांक ६.०५.२०१४
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांकः एससीवाय ०५/२०१५/प्र.क्र.६९/म-११, दिनांक ३१.०८.२०१५
७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१४/प्र.क्र. ८९/पापु १४, दिनांक २६.८.२०१४
८) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१५/प्र.क्र. ३७/पापु १४, दिनांक २५.३.२०१५
९) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१५/प्र.क्र. ७५/पापु १४, दिनांक ७.५.२०१५
१०) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१५/प्र.क्र. ४८/पापु १४, दिनांक १०.४.२०१५

११) विभागीय आयुक्त कोकण यांचे क्रमांक मशा/कार्या-२/ टंचाई/निधी मागणी २०१५, दिनांक ७.७.२०१५ चे पत्र व प्रस्ताव.
१२) विभागीय आयुक्त नाशिक यांचे क्रमांकः लेखा/कक्ष/२३/३/कावि/३१८८१/१५, दिनांक २२.७.२०१५ चे पत्र व प्रस्ताव
१३) विभागीय आयुक्त अमरावती यांचे क्रमांकः विआका/पाणी टंचाई/अका/कावि-२७७/२०१५, दिनांक २८.७.२०१५ चे पत्र व प्रस्ताव
१४) विभागीय आयुक्त औरंगाबाद यांचे क्रमांकः २०१४/मशाका/का-२/नेआ१/कावी-१७, दिनांक २४.७.२०१५ चे पत्र व प्रस्ताव
१५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१५/प्र.क्र.१०४/पापु १४, दिनांक १२.०६.२०१५

**प्रस्तावना :-**

ग्रामीण व नागरी पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च लेखाशीर्ष "२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येतो. महसूल व वन विभागाने सन २०१५-१६ या चालू वित्तीय वर्षात महसूल व वन विभागाने पिण्याच्या पाण्याची टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांकरीता रुपये १५७००.०० लक्ष इतक्या रक्कमेची तरतुद केली आहे. सदर निधीपैकी महसूल व वन विभागाने रुपये ८९६९.४३ लक्ष इतका निधी या विभागास दिनांक १०.६.२०१५ च्या शासन निर्णायान्वये वर्ग केला होता. सदर निधी संबंधित क्षेत्रीय यंत्रणांना संदर्भ क्र.१५ येथील दि.१२.६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला आहे. सद्यस्थितीत महसूल व वन विभागाने संदर्भ क्रमांक ६ येथील दि.३१.०८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये रुपये ६७३०.०० लक्ष इतका निधी या विभागास वर्ग केला आहे. सदर निधी संबंधित विभागीय आयुक्त यांच्या संदर्भ क्रमांक ११ ते १४ मधील पत्रांद्वारे केलेल्या मागणीच्या अनुषंगाने तसेच प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांच्या अध्यक्षतेखालील स्थायी समितीने मान्यता दिलेल्या योजनांना संदर्भ क्रमांक ७ ते १० शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिल्याच्या अनुषंगाने सदर योजनांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार कोकण, नाशिक, औरंगाबाद व अमरावती या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या / राबविण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी तक्ता **'ब'** मध्ये नमूद केल्याप्रमाणे **रुपये ६७३०.०० लक्ष (रुपये सदुसष्ट कोटी तीस लक्ष फक्त**) इतका निधी विभागीय आयुक्त कोकण, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांना संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयामध्ये

विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती</u>

१) विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांनी सदर निधी जिल्हाधिकारी यांना वितरीत करतांना उपाययोजनानिहाय निधी वितरीत करण्याची दक्षता घ्यावी.

२) सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजना करीता तसेच, पूर्वीच्या प्रलंबित देयकाच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा.

३) प्रधान सचिव (पा.पु.व स्व.वि.) यांच्या अध्यक्षतेखालील स्थायी समितीद्वारे मंजूर केलेल्या उपाययोजनांना तक्ता **'अ' प्रमाणे** प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. विभागीय आयुक्त यांनी त्यांना तक्ता **'ब'** प्रमाणे वितरित करण्यात येत असलेल्या निधीमधून प्रथम तक्ता **'अ'** मधील मंजूर उपाययोजनांसाठी निधी वितरीत करावा.

**तक्ता 'अ'**

| **विभाग** | **स्थायी समितीने मंजूर केलेल्या उपाययोजनेचे नाव** | **प्रशासकीय मान्यता शासन निर्णय** | **वितरित करावयाचे अनुदान रु.लक्ष** |
|---|---|---|---|
| औरंगाबाद | नांदेड वाघाळा शहर मनपाची तातडीची पाणी पुरवठा योजना | २६.८.२०१४ | १२९२.१६ |
| | मौजे जळकोट ता. जळकोट, जि. लातूर- तात्पुरती न.पा. योजना | २५.३.२०५ | १३५.४८ |
| | उस्मानाबाद नपाची शेकापूर साठवण तलावातून तातडीची पापु योजना | ७.५.२०१५ | ५५.०२ |
| अमरावती | अकोला मनपाच्या पा. पु. योजनेच्या जलशुध्दीकरण केंद्रसाठी पंपींग मशिनरी व अनुषंगिक बाबी | ११.६.२०१५ | १४४.९३ |
| | | **एकूण ........** | **१६२७.५९** |

४) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांना तक्ता **'ब'** मधील वितरित केलेल्या निधीमधून जिल्हाधिकारी, बुलढाणा यांचेकडून प्राप्त झालेल्या मागणीनुसार सन २०१२-१३ व २०१३-१४ मधील प्रलंबित देयके अदा करण्यासाठी त्यांनी मागणी केल्याप्रमाणे **रु. ३२४.१९ लक्ष** निधी त्यांच्याकडे वितरित करण्यात यावा.

५) टंचाई निवारणाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करताना टंचाई निवारणाच्या कोणकोणत्या उपाययोजना करण्याकरिता आणि कोणत्या कालावधीसाठी निधीची बाब

निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादिबाबतची माहिती सादर केल्याशिवाय यापुढील निधी मंजूर केला जाणार नाही.

६) सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी देण्यात आला आहे त्यातून देयके अदा करताना टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली असणे व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फे-या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. ज्या पाणी पुरवठा करणा-या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास अशा फे-या बनावट ठरतील व त्यासाठी सदर अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांस निधी वितरीत करण्यात येऊ नये.

७) विभागीय आयुक्तांकडे सोपविलेल्या निधीचा विनियोग करताना सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याचा त्याच प्रयोजनासाठी वापर होत आहे तसेच निधीचे वाटप करतांना संबंधित कामासाठी पूर्वी निधी वितरीत करण्यात आला नाही याची खातरजमा विभागीय आयुक्त यांनी करावी. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्त यांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

८) याबाबतचा खर्च “मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ ००९३) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या उपलेखाशीर्षांमध्ये भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

९) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व बिलासोबत जोडल्या जाणा-या कॉम्प्युटर स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून उपकोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचा अहवाल शासनास सादर करावा.

१०) सदर आदेश वित्त विभागाने महसूल व वन विभागास दिलेल्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३५०/२०१५/व्यय-९, दिनांक ३१.८.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील विभागनिहाय खालीलप्रमाणे आहे:

**तक्ता 'ब'**

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | विभाग | वितरीत करण्यात येत असलेले अनुदान |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कोकण | १२८.११ |
| २ | नाशिक | ७६८.६९ |
| ३ | औरंगाबाद | ४३५५.९७ |
| ४ | अमरावती | १४७७.२३ |
| | **एकूण** | **६७३०.००** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०९०२१०४१२३२५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Nandkishor M Garud

Digitally signed by Nandkishor M Garud
DN: CN = Nandkishor M Garud, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.02 16:31:33 +05'30'

**(नंदकिशोर गरुड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई

२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (म.व पु.), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
८. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
९. उप सचिव / पापु-१४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
१०.विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद,.
११.पापु-१४ संग्रहासाठी.